**शैक्षणिक वर्ष २०२४-२५**

**कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्व विद्यालय, रामटेक अंतर्गत नवीन अभासक्रमांना मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:HTED-२९०६६(१३)/२/२०२४/८०२२८७-MHT-(HE-४)**

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२

दिनांक: १५ जुलै २०२४.

**संदर्भ:** १) शासन निर्णय क्र. एनजीसी २०१७/(२२९/१७)/मशि-४, दिनांक १२.१०.२०१७.

२) दिनांक ५.०७.२०२४ रोजी अधिसूचित करण्यात आलेला महाराष्ट्र अधिनियम क्र.XXIV/२०२४, महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ (सुधारणा)अधिनियम, २०२४.

**शासन निर्णयः-**

कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक अधिनियम, १९९७ आणि संदर्भाधीन शासन निर्णय, दिनांक १२.१०.२०१७ अन्वये, विहीत केलेल्या कार्यपद्धतीनुसार राज्यातील कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक, नागपूर या विद्यापीठाने शैक्षणिक वर्ष २०२४-२५ साठी विस्तारीकरणांतर्गत नवीन अभ्यासक्रम यांचे प्रस्ताव शासन मान्यतेसाठी अग्रेषित केले आहेत. सदर प्रस्तावांची संदर्भाधीन शासन निर्णयान्वये विहीत करण्यात आलेल्या निकषांप्रमाणे छाननी करण्यात आली. विद्यापीठाची शिफारस व शासनस्तरावर तपासणीअंती पात्र ठरलेल्या सोबतच्या विवरणपत्र- अ मध्ये नमूद केलेल्या विस्तारीकरणांतर्गत एकूण ४ अभासक्रमांच्या प्रस्तावांना, कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक अधिनियम, १९९७ मधील कलम ६२(५) अन्वये शासनास प्राप्त अधिकारानुसार खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून **कायम विना अनुदान तत्वावर** मंजूरी देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१. ज्या अनुदानित महाविद्यालयांना नवीन अभ्यासक्रम मंजूर करण्यात आलेल्या आहेत, त्या कायम विनाअनुदान तत्त्वावरील असल्याने सदर मान्यतेच्या अनुषंगाने अशा महाविद्यालयांना अनुदान तत्त्वावर शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांची मागणी करता येणार नाही.

२. ज्या महाविद्यालयांना/संस्थांना नवीन अभासक्रम मंजूर करण्यात आला आहे, त्या महाविद्यालयांनी/संस्थांनी संबंधित विभागीय सहसंचालकांकडे ते भविष्यात कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची मागणी करणार नाहीत, असे हमीपत्र रु. १००/- च्या नॉन ज्युडीशियल स्टँप पेपरवर सादर करावे.

३. संबंधित विद्यापीठाने विहित केलेल्या निकषांनुसार व विद्यापीठ अनुदान आयोगाने विहित केलेल्या शैक्षणिक पात्रतेनुसार महाविद्यालयांनी अध्यापक/कर्मचारी वर्ग नेमणे आवश्यक असून, इतर सर्व आवश्यक पायाभूत सोयी उपलब्ध कराव्यात व त्याची खात्री विभागीय सहसंचालकांनी करावी आणि तद्‌नंतरच उपरोक्त अट क्र. २ मधील प्रमाणपत्र प्रमाणित करून विद्यापीठास द्यावे.

४. महाविद्यालयाने/संस्थेने हमीपत्र सादर केल्याशिवाय आणि तसे विभागीय सहसंचालकांचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय तसेच विद्यापीठ अनुदान आयोगाच्या (ॲफिलिएशन ऑफ कॉलेजस बाय युनिव्हर्सिटीज) रेग्युलेशन २००९ मध्ये महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याबाबत विहित निकषांची पूर्तता केल्याशिवाय संबंधित महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याची कार्यवाही विद्यापीठाने करु नये.

५. महाविद्यालयाने कोणत्याही परिस्थितीत मंजूर प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नयेत.

६. सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील महाविद्यालयांनी प्रकरणपरत्वे नॅक मुल्यांकन/पुनर्मुल्यांकन करुन घेण्यासाठी संबंधित विद्यापीठाने पाठपुरावा करावा.

७. विद्यापीठांनी शासन निर्णयाचे अवलोकन केल्याशिवाय संलग्नता देण्याची प्रक्रिया सुरु करु नये. विद्यापीठांनी संलग्नतेबाबतचा पूर्तता अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे व संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण यांना पाठवावा.

८. संबंधित विद्यापीठांनी व विभागीय सहसंचालकांनी मंजूर करण्यात आलेल्या नवीन महाविद्यालयांचा नियतकालिक आढावा घेऊन, सदर महाविद्यालयांमध्ये मंजुर विद्यार्थी संख्येच्या ५०% किंवा त्यापेक्षा कमी विद्यार्थी दिसून आल्यास, सदर महाविद्यालयांची मान्यता रद्द समजून तसे आदेश विभागीय सहसंचालकांनी काढावेत आणि ते शासन व संबंधित विद्यापीठाकडे पाठवावेत.

२. महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम २०१६ मधील तरतूदीनुसार विस्तारीकरणांतर्गत /नवीन महाविद्यालयांना मान्यता देणेबाबत शासन निर्णय निर्गमित करण्याची अंतिम मुदत १५ जून अशी आहे. परंतु शासन अधिसूचना दि. ०५.०७.२०२४ अन्वये सार्वजनिक विद्यापीठांमधील अभ्यासक्रमांना मान्यता देण्याची मुदत १५ जुलै पर्यंत वाढविण्यात आली आहे. त्याचधर्तीवर सक्षम प्राधिकरणाच्या मान्यतेने कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक अंतर्गत विस्तारीकरणांतर्गत नवीन अभ्यासक्रमांना मान्यता देणेबाबत शासन निर्णय निर्गमित करण्याची अंतिम मुदत १५ जुलै पर्यंत वाढविण्यात आली आहे.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०७१५११२२३६४६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by ASHOK S MANDE
Date: 2024.07.15 11:51:57 +05'30'

**( अशोक मांडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) कुलसचिव, कवी कुलगुरु कालिदास संस्कृत विश्व विद्यालय, रामटेक.
७) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) विभागीय सहसंचालक (पुणे/नागपूर) उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य.
९) संबंधित संस्था (विद्यापीठामार्फत)
१०) निवड नस्ती (मशि-४).

**शासन निर्णय क्रमांक : HTED-२९०६६(१३)/२/२०२४/८०२२८७-MHT-(HE-४)**
**दिनांक १५ जुलै २०२४ सोबतचे_सहपत्र.**

**विवरणपत्र- अ**

| अ. क्र. | क्र. | संस्था / महाविद्यालयाचे नाव | प्रस्तावित अभ्यासक्रम |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| | | **नागपूर विभाग** | |
| १. | १. | लोकार्पण बहुउद्देशीय सामाजिक शिक्षण संस्था, बरडकिन्ही, ता. ब्रह्मपुरी, जि. चंद्रपूर -४४१२०६.<br>लोकार्पण महाविद्यालय,<br>गांगलवाडी, ता. ब्रह्मपुरी, जि. चंद्रपूर - ४४१२०६. | बी.ए. (योगशास्त्र) |
| २. | २. | लोकार्पण बहुउद्देशीय सामाजिक शिक्षण संस्था,<br>बरडकिन्ही, ता. ब्रह्मपुरी, जि. चंद्रपूर - ४४१२०६.<br>लोकार्पण महाविद्यालय,<br>वरठी, ता. मोहाडी, जि. भंडारा - ४४१९०५. | बी.ए. (योगशास्त्र) |
| ३. | ३. | मनीषा शिक्षण प्रसारक मंडळ,<br>नागपूर.<br>मॅक्सवेल महाविद्यालय,<br>धामना, ता. जि. नागपूर. | बी.एससी. (योगा नॅचरोपॅथी अँड डायटेटिक्स) |
| | | **पुणे विभाग** | |
| ४. | १. | सूर्यदत्त एज्युकेशन फाऊंडेशन,<br>२०७४, सदाशिव पेठ, टिळक रोड, पुणे - ४११०३०.<br>सूर्यदत्त कॉलेज ऑफ मॅनॅजमेन्ट, इन्फॉरमेशन अँड रिसर्च टेक्नोलॉजी,<br>बावधन बु., ता. मुळशी, जि. पुणे - २१. | १) बी.एस्सी. (योगिक सायन्स)<br>२) बी.ए. (योगशास्त्र)<br>३) बी.एस्सी. (योगा नॅचरोपॅथी अँड डायटेटिक्स) |

Digitally signed by ASHOK S MANDE
Date: 2024.07.15 11:52:12 +05'30'

**(अशोक मांडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**